केंद्र पुरस्कृत कृषि उन्नती योजना, राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान - गळीत धान्य व तेलताड पिकांकरिता सन २०१९-२० या आर्थिक वर्षातील केंद्र शासनाकडून प्राप्त निधी वितरीत करणेबाबत. (TRFA गळीतधान्य व तेलताड पिके) लेखाशिर्ष २४०१ A५५७)

महाराष्ट्र शासन
आदिवासी विकास विभाग
शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०१९ / प्र.क्र.७ / कार्यासन.६
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक :- ६ फेब्रुवारी, २०२०

**वाचा -**

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१९ /प्र.क्र.४४ / अर्थ-३, दि.०१.०४.२०१९.
२) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१९ /प्र.क्र.९२ / अर्थ-३, दि.०८.०७.२०१९.
३) केंद्र शासन, कृषि आणि शेतकरी कल्याण मंत्रालयाचे पत्र क्रमांक २०-१/२०१८एनएफएसएम-सीओ-V, दिनांक ०४.०९.२०१८.
४) केंद्र शासन, कृषि आणि शेतकरी कल्याण मंत्रालयाचे पत्र क्रमांक १४-१/२०१९-सीअे-II, दिनांक १७.०९.२०१९.
५) केंद्र शासन, कृषि आणि शेतकरी कल्याण मंत्रालयाचे पत्र क्रमांक १४-१/२०१९-CA-II, दिनांक ०८.११.२०१९.
६) शासन निर्णय समक्रमांक दि. ०८.०१.२०२०.
७) कृषि व पदुम विभागाची नस्ती क्र. असुअ-१०१९ / प्र.क्र.१०२ / ४-अे.

**शासन निर्णय-**

केंद्र पुरस्कृत कृषि उन्नती योजना, राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान( NFSM) अन्नधान्य पिकांकरिता अनुसूचित जमाती प्रवर्गासाठी मागणी क्र. टी-५, २४०१- पीक संवर्धन, ७९६- जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१) जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१) (२१) कृषि उन्नती योजना - राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान-अन्न धान्य पिके (कें.पु.यो. केंद्र हिस्सा ६० टक्के ) (२४०१ A५५७), ३३- अर्थसहाय्य या लेखाशिर्षाखाली रु.२०१०.८० लाख इतका निधी सन २०१९-२० या आर्थिक वर्षासाठी अर्थसंकल्पीत करण्यात आलेला आहे.

२. वाचा क्र. ३ व ४ नुसार सन २०१८-१९ पासून राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियानांतर्गत लघु अभियान-१ (तेलबीया) व लघु अभियान-३ (वृक्षजन्य तेलबीया) म्हणून समावेश केला असून वाचा क्र. ७ येथील प्रस्तावानुसार सदर योजनेसाठी कृषि विभागाने केंद्र हिश्श्याची मागणी केली आहे. सदर योजनेच्या केंद्र हिश्श्यापोटी लेखाशिर्ष (२४०१ A५५७), ३३- अर्थसहाय्य (गळीतधान्य व तेलताड पिकाकरीता) या लेखाशिर्षाखाली रु.५.८१ लाख ( अक्षरी रुपये पाच लाख एक्क्याएंशी हजार फक्त ) इतका निधी प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून सचिव (कृषी), कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांना अर्थसंकल्पीय निधी वितरण प्रणालीवर (BEAMS ) वितरीत व खर्च करण्यास मंजूरी प्रदान करण्यात येत आहे. त्यास समरुप आवश्यक राज्य हिस्सा जिल्हा वार्षिक आदिवासी उपयोजनेमधुन देण्यात यावा.

३. सदर निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला आहे. नियंत्रण अधिकारी / विभागप्रमुख यांनी खर्चासंबंधीच्या सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखडयानुसार याच वर्षात सदर निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी. तसेच उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय / उपलेखाशिर्षनिहाय तसेच साध्य झालेले भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र, संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक; संबंधित अपर आयुक्त, आदिवासी

विकास; आदिवासी विकास विभाग व कृषि व पदुम विभाग यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवणेबाबत सूचना देण्यात यावी.

४. नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, अतिरिक्त आदिवासी उपयोजना क्षेत्रात तसेच आदिवासी घटक कार्यक्रम क्षेत्राबाहेरील योजनांवर केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला आदिवासी क्षेत्रातील व उपयोजने क्षेत्राबाहेरील योजनांवर होणा-या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

५. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेली तरतूद फक्त आदिवासी लाभार्थ्यांकरिता व आदिवासी उपयोजना क्षेत्रांतर्गत खर्च करण्यात यावी. तसेच आदिवासी उपयोजना क्षेत्राबाहेर केलेली तरतूद त्या क्षेत्रातील आदिवासी लाभार्थ्यांकरिताच खर्च करण्यात यावी.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाने **वाचा** येथील क्रमांक १ व २ अन्वये विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये, तसेच अनौपचारिक संदर्भ क्र.४२८/अर्थोपाय, दि.३०.११.२०१९ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००२०६१२१२२६२०२४ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kiran Kisanrao Pawar

Digitally signed by Kiran Kisanrao Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=68d8b19f123ba59448c0926a91296205b9a87463f831a2beea0be5cb381a34e8, cn=Kiran Kisanrao Pawar
Date: 2020.02.06 18:00:14 +05'30'

किरण कि. पवार
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. सचिव ( कृषि ) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य,पुणे
३. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
४. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक / नागपूर / ठाणे / अमरावती.
५. वित्त विभाग ( अर्थसंकल्प- १९ ), मंत्रालय, मुंबई.
६. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा मजला, विधानभवन, मुंबई.
७. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
८. कार्यासन क्र. २ व ९, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभा, मंत्रालय, मुंबई.